**अपंग समावेशित शिक्षण योजना (माध्यमिक स्तर) अंतर्गत विशेष शिक्षक यांचे वेतन अदा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- न्यायाप्र २०२४/प्र.क्र.१२९ (ई-१०९८८८३)/ एसडी-१**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०००३२
दिनांक :-२९ मे, २०२५

**संदर्भ :-**

१) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे दि.२६.०४.२०२५ रोजीचे पत्र
२) वित्त विभागाचे क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०७.०४.२०२५ चे परिपत्रक
३) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांचे दि.१५.०५.२०२५ रोजीचे आदेश

**प्रस्तावना :-**

अपंग समावेशित शिक्षण योजना (माध्यमिक स्तर) अंतर्गत सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांच्या अध्यक्षतेखालील चौकशी समितीच्या अहवालानुसार पडताळणीअंती पात्र ठरलेल्या विशेष शिक्षिका श्रीम. कुशीवर्ता सुंदरराव कोल्हे यांनी थकीत वेतन अदा करण्यासाठी मा. उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका क्र.९७४५/२०२४ मध्ये दाखल केली आहे. शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जि.प., बीड यांच्या केलेल्या मागणीच्या अनुषंगाने तसेच मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल रिट याचिका क्र.९७४५/२०२४ च्या अनुषंगाने श्रीम.कुशीवर्ता सुंदरराव कोल्हे यांना थकीत वेतन अदा करण्यासाठी रु. ९,२४,२९०/- इतका निधी वितरीत करावयाचा आहे.

२. तसेच अपंग समावेशित शिक्षण योजना (माध्यमिक स्तर) अंतर्गत विशेष शिक्षकांनी मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका क्र.४९२/२०२४ दाखल केली आहे. रिट याचिका क्र.४९२/२०२४ व संलग्न याचिकांमध्ये मा. उच्च न्यायालयाने दि.२१.०३.२०२५ रोजी अपंग समावेशित शिक्षण योजना (माध्यमिक स्तर) अंतर्गत ३५८ नियमित नियुक्ती व समायोजनासाठी पात्र विशेष शिक्षकांना या याचिकेचा अंतिम निकाल लागेपर्यंत प्रति शिक्षक प्रतिमाह रु.७५,०००/- प्रमाणे वेतन अदा करण्याबाबत आदेशित केले आहे. समग्र शिक्षा या केंद्र पुरस्कृत योजनेमध्ये अपंग समावेशित शिक्षण योजना (माध्यमिक स्तर) या योजनेमधील पात्र शिक्षकांसाठी रु.२५,०००/- प्रमाणे तरतूद मंजूर केली जाते. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांनी दि.१५.०५.२०२५ रोजीच्या आदेशान्वये एप्रिल, २०२५ या महिन्याच्या वेतनासाठी रु.२५,०००/- प्रमाणे निधी वितरीत केलेला आहे.

उपरोक्तप्रमाणे न्यायालयीन प्रकरणातील आदेशानुसार श्रीमती कुशीवर्ता सुंदरराव कोल्हे व ३५३ विषयाधीन विशेष शिक्षकांना मानधन अदा करण्यासाठी रु.१५,९७,७४,२९०/- इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अपंग समावेशित शिक्षण योजना (माध्यमिक स्तर) अंतर्गत मा. उच्च न्यायालयात दाखल याचिकांच्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे:-

| क्र. | तपशिल | निधी |
|---|---|---|
| १. | मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल रिट याचिका क्र.९७४५/२०२४ च्या अनुषंगाने श्रीम.कुशीवर्ता सुंदरराव कोल्हे, विशेष शिक्षक यांना थकीत वेतन अदा करण्यासाठी निधी | रु.९,२४,२९०/- |
| २. | मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर व खंडपीठ औरंगाबाद येथे | रु. १५,८८,५०,०००/- |

| | | |
|---|---|---|
| | दाखल याचिका क्र.३६९६/२०१८व इतर संलग्न याचिका तसेच रिट याचिका क्र.४९२/२०२४ व संलग्नित याचिकेतीलएकूण ३५३ विशेष शिक्षकांना माहे एप्रिल, २०२५ ते सप्टेंबर, २०२५ या कालावधीतील रु.७५,०००/- प्रति शिक्षक प्रतिमहा प्रमाणे वेतन अदा करण्यासाठी निधी | |
| | **एकूण आवश्यक निधी** | **रु. १५,९७,७४,२९०/-** |

२. थकित / नियमित वेतनाची रक्कम संबंधित विशेष शिक्षकांच्याच खात्यात जमा करावी. या विशेष शिक्षकांना वेतनाची रक्कम वितरीत करताना, राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांनी या पात्र शिक्षकांच्या वेतनासाठी वितरीत केलेला रु.२५,०००/- निधी विचारात घेऊन या विशेष शिक्षकांच्या वेतनाची रक्कम अदा करण्याची कार्यवाही करण्यात यावी. याबाबत कोणतीही अनियमितता झाल्याचे निदर्शनास आल्यास शिक्षण संचालक (प्राथमिक), पुणे यांना जबाबदार धरण्यात येईल. सदर थकीत / नियमित वेतनाच्या रकमेची अनुज्ञेयता व परिगणना शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी तपासण्याच्या अधीन राहून निधी वितरणास मान्यता देण्यात येत आहे. उपरोक्तनुसार वेतन अदा केल्यानंतर निधी शिल्लक राहिल्यास त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा. शिल्लक निधीचा विनियोग करण्यापुर्वी शासनाची पूर्वमान्यता घेण्यात यावी. वितरीत करण्यात आलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र एक महिन्याच्या कालावधीत शासनास सादर करावे.

३. सदर खर्च "मागणी क्र. ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, १०६-शिक्षक व इतर सेवा, (००) (००) (०१) समग्र शिक्षा अभियान (सर्वसाधारण) (राज्य हिस्सा ४० टक्के) (२२०२ आय ६१२) (कार्यक्रम), ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ या वित्तीय वर्षामध्ये उपलब्ध असलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. सदर निधी राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांचेकडे सुपूर्त करण्यात येत आहे. सदर निधी आहरीत करून वितरीत करण्यासाठी अवर सचिव/ कक्ष अधिकारी (रोख शाखा/ लेखा शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना "आहरण व संवितरण अधिकारी" तर सह सचिव/ उप सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. . संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी निधी कोषागारातून आहरीत करुन समग्र शिक्षा योजनेच्या SNA खात्यात जमा करावा. सदर निधी राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांनी शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या कडे सुपूर्त करावा.

५. वित्त विभाग, शासन परिपत्रक दि. ०७.०४.२०२५ मध्ये नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता होत आहे. सदरचे अनुदान सशर्त अनुदान असून त्याकरिताच्या अटी व शर्ती या शासन निर्णयात नमूद केल्या आहेत.

६. सदर शासन निर्णय नियोजन विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.२९७/१४७१, दि.०८.०५.२०२५ व वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.६१५/व्यय-५, दि.०९.०५.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५२९१८४८२४३६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAMDAS GANPAT DHUMAL

Digitally signed by RAMDAS GANPAT DHUMAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=3246a8286e67ae7423b98bfd800865585eb8601521f097ab07142d65ea9b2b15, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=24F4ACDDCFF993441F6C634862546E9D122E0DB556806B179B794879ACF360F5, cn=RAMDAS GANPAT DHUMAL
Date: 2025.05.29 18:50:08 +05'30'

**(रामदास धुमाळ)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यापालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा. अध्यक्ष / सभापती, विधान सभा / विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
४. मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, सर्व.
५. मा. विरोधी पक्षनेता, विधान सभा / विधान परिषद, विधान भवन, मुंबई
६. मा. विधान सभा / विधान परिषद, विधान भवन, मुंबई (सर्व)
७. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
८. प्रधान सचिव, (शालेय शिक्षण विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई
११. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१२. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर
१४.संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई-६३
१५.सर्व वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग)
१६. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
१७. उप सचिव, वित्त विभाग, (व्यय-५/अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई
१८. उप सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१९. उप सचिव, (१४७१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
२०. अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. अवर सचिव/कक्ष अधिकारी, लेखाशाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
२२.निवड नस्ती (एसडी-१)